**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (खुद्द) साठी खरेदी समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः समिती-२०२०/प्र.क्र.०७/पापु-०२,**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, ७ वा मजला,
नवीन मंत्रालय, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : ०४ फेब्रुवारी २०२०.

**वाचा :**

१) **उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक : भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-०४, दिनांक ०१ डिसेंबर २०१६.**
२) **पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-१०१७/प्र.क्र.१७/पापु-०२, दिनांक २९ मे २०१७.**

**प्रस्तावना :**

संदर्भाधीन क्रमांक १ वरील शासन निर्णयानुसार शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपद्धतीची नियमपुस्तिका विहित केली आहे. सदर नियम पुस्तिकेच्या परिच्छेद ३.२ मध्ये विविध रकमेच्या खरेदीकरिता खरेदीचे प्रकार नमूद करण्यात आले असून परिच्छेद २.९.३ मध्ये नमूद केल्यानुसार सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना खरेदी प्रक्रिया पूर्ण करता यावी, यासाठी प्रत्येक प्रशासकीय विभाग / कार्यालया अंतर्गत खरेदी समिती गठीत करावयाची आहे. त्यामुळे संदर्भाधीन क्रमांक ०२ येथील शासन निर्णय रद्द करून, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (खुद्द) स्तरावर नव्याने खरेदी समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय :

शासन निर्णय वर नमूद केल्यानुसार पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (खुद्द) स्तरावर संदर्भाधीन शासन निर्णयान्वये विहित केलेल्या नियमपुस्तिकेत निश्चित केलेल्या कार्यपद्धतीनुसार खरेदी प्रक्रिया हाती घेण्यासाठी खालील प्रमाणे खरेदी समिती स्थापन करण्यात येत आहे.

| अ. क्र. | तपशील | पदनाम |
|---|---|---|
| १. | संबंधित विभागाचे सहसचिव / उप सचिव (खरेदीशी संबंधित) | अध्यक्ष |
| २. | उद्योग सहसंचालक (भांख), उद्योग संचालनालयाचा प्रतिनिधी | निमंत्रित |
| ३. | लेखा व कोषागार संचालनालयाचे प्रतिनिधी किंवा गट-ब दर्जाचा लेखा अधिकारी | निमंत्रित |
| ४. | संबंधित खरेदीदार विभागाचा खरेदी अधिकारी (संबंधित अवर सचिव / कार्यासन अधिकारी) | सदस्य सचिव |

२. उक्त समिती खरेदीच्या कार्यपद्धतीची नियमपुस्तिकेतील निर्देशांचे पालन करील. नियमपुस्तिकेत विहित केलेल्या खरेदी कार्यपद्धतीचा अवलंब करुन खरेदी करावयाच्या बाबीसंबंधित सर्व निर्णय समितीला घेता येतील.

३. विभाग प्रमुखांनी खरेदीचे वित्तीय मर्यादेचे अधिकार समितीला प्रदान केले आहेत. समितीने त्यांचे वित्तिय अधिकाराच्या मर्यादेत खरेदी प्रक्रिया राबवावी. रु. ३,००,०००/- (रुपये तीन लाख) लाखांपर्यंतच्या खरेदीस समितीची मान्यता घेण्याची आवश्यकता नाही.

४. विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो) व सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (जलस्वराज्य-२ कार्यक्रम) या कार्यालयांनी त्यांच्या स्तरावर स्वतंत्रपणे खरेदी समिती गठित करण्याबाबतची कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२०३१७३०२३८३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deshmukh Varsha Gunvant

Digitally signed by Deshmukh Varsha Gunvant
DN: CN = Deshmukh Varsha Gunvant, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2020.02.05 11:07:13 +05'30'

(वर्षा देशमुख)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
५. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
६. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई
७. संचालक, लेखा व कोषागारे, प्रशासकीय इमारत, मुंबई.
८. संचालक, उद्योग संचालनालय, मुंबई
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक
११. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व सह / उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी
१२. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग (उद्योग-०४), मंत्रालय, मुंबई.